जम्मू-काश्मिर खोऱ्यातील पुलवामा जिल्ह्याती
दहशतवादी हल्ल्यात शहिद झालेल्या जवानांच
कुटुंबियांसाठी श्री सिध्दीविनायक गणपती मंदि
न्यासाकडून आर्थिक मदत देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण -१०१९/प्र.क्र.३३/का.१६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २० फेब्रुवारी, २०१९.**

**संदर्भ:-** प्रभारी कार्यकारी अधिकारी,श्रीसिध्दीविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांचे पत्र क्र. सविगंम/१५८१/२०१९, दि.१६.०२.२०१९

**प्रस्तावना :-**

दि.१४.०२.२०१९ रोजी जम्मू काश्मिर खोऱ्यातील पुलवामा जिल्ह्यात भारतीय जवानांवर भ्याड दहशतवादी हल्ला करण्यात आला. या हल्ल्यात शहिद झालेल्या भारतीय सैन्य दलातील कुटुंबियांना श्री सिध्दीविनायक गणपती मंदिर न्यास व्यवस्थापन समितीच्या दि. १५.०२.२०१९ रोजीच्या सभेत रु.५१ लाख इतका मदत निधी उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुषंगाने श्री सिध्दीविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांचेकडून दि.१६.०२.२०१९ रोजीच्या पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झालेला आहे. देशाचे संरक्षण करताना हुतात्म्य प्राप्त झालेल्या जवानांच्या कुटुंबियांना मानवतावादी दृष्टीकोनातून मदत देणे आवश्यक असल्यामुळे या प्रस्तावास "एक विशेष बाब" म्हणून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

दि.१४.०२.२०१९ रोजी जम्मू काश्मिर खोऱ्यातील पुलवामा जिल्ह्यात दहशतवादी हल्ल्यात हौतात्म्य प्राप्त भारतीय जवानांच्या कुटुंबियांना आर्थिक मदत म्हणून रु.५१ लाख इतका निधी श्री सिध्दीविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई यांच्याकडून देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharahstra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१९०२२१११७२३४२१२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2019.02.21 11:19:31 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
**कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.**

**प्रति:-**
१) मा अध्यक्ष, श्री सिध्दीविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.राज्यमंत्री, विधि व न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) कार्यकारी अधिकारी, श्री सिध्दीविनायक गणपती मंदिर न्यास, प्रभादेवी, मुंबई.
५) निवड नस्ती/का.१६